**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि-१११८/प्र .क्र.१/१४ ब.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: ०६ डिसेंबर, २०१८

संदर्भ : १) या विभागाचे समक्रमांक दिनांक २५.०५.२०१८ चे आदेश
२) या विभागाचे समक्रमांक दिनांक ३१.०५.२०१८ चे आदेश.

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(१), ४(२) व ४(३) अनुसार नियोजन विभागातील श्री.प्र.र.पिंपळे, कक्ष अधिकारी यांची बदलीने पदस्थापना सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात करण्यात आली आहे. या संदर्भात नियोजन विभागाच्या विनंतीस अनुसरुन संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये श्री.पिंपळे यांच्या बदलीस प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या जागी पर्यायी कक्ष अधिकारी तयार करण्याच्या अटीच्या अधीन राहून दिनांक ३०.११.२०१८ पर्यंत अंतिम स्वरुपाची स्थगिती देण्यात आली होती.

२. प्रस्तुत आदेशान्वये श्री.पिंपळे, कक्ष अधिकारी यांना दिनांक ०६.१२.२०१८ (म.नं.) पासून सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात रुजू होण्यासाठी एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री.पिंपळे यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात दिनांक ०६.१२.२०१८ (म.नं.) रोजी रूजु व्हावे. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून नियोजन विभागाने स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

३. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ चे नियम १२ मधील तरतुदीनुसार श्री.पिंपळे, कक्ष अधिकारी यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नाही त्यामुळे ते जर दिनांक ०६.१२.२०१८ (म.नं.) रोजी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात रूजू झाले नाहीत तर, त्यापुढील कालावधी हा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी समजण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०६१२३८०५६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.06 12:48:39 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.प्र.र.पिंपळे, कक्ष अधिकारी , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत,

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
३. सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. निवडनस्ती.